जनहित याचिका क्र.१०३००/२०२१ श्री.रतन सोली लुथ विरुध्द महाराष्ट्र शासन या न्यायालयीन प्रकरणामध्ये नियुक्त विशेष समुपदेशी यांची फी अदा करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः याचिका-२०२१/प्र.क्र.९५/पाच**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १४ सप्टेंबर, २०२१

वाचा :-

१) विधि व न्याय विभागाचे पत्र क्र.३१४/२०२१/ई, दिनांक २९.०६.२०२१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि.२९.०७.२०१५
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दि.१६.०६.२०१७
४) संसदीय कार्य विभाग, शासन निर्णय क्रमांक याचिका-२०२१/प्र.क्र.९५/पाच, दि.२५.०८.२०२१

**प्रस्तावना :**

श्री.रतन सोली लुथ यांनी, मा. राज्यपाल महोदयांनी विधानपरिषदेवर नामनिर्देशनाने नियुक्त करावयाच्या १२ सदस्यांच्या संदर्भात मुंबई उच्च न्यायालय येथे जनहित याचिका क्रमांक १०३००/२०२१ दाखल केली होती. सदर जनहित याचिकेमध्ये महाराष्ट्र शासनास प्रतिवादी करण्यात आले होते. प्रस्तुत याचिकेमध्ये शासनाची बाजू मांडण्यासाठी उपरोक्त संदर्भाधीन १ येथील पत्रान्वये, श्री.रफिक अहमद दादा, विशेष समुपदेशी, उच्च न्यायालय, मुंबई यांची नियुक्ती करण्यात आली होती.

प्रस्तुत जनहित याचिकेमध्ये श्री.रफिक अहमद दादा, विशेष समुपदेशी यांनी शासनाची बाजू मांडली असून, त्यासाठी त्यांचेकडून आकारण्यात आलेले व्यावसायिक शुल्क अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मुंबई उच्च न्यायालय येथे दाखल करण्यात आलेल्या जनहित याचिका क्रमांक १०३००/२०२१ मध्ये, मा.उच्च न्यायालयासमोर दिनांक १९.०७.२०२१ रोजी झालेल्या सुनावणीच्या वेळी शासनाची बाजू मांडण्यासाठी, श्री.रफिक अहमद दादा, विशेष समुपदेशी यांच्याकडून आकारण्यात आलेल्या व्यावसायिक शुल्काची रक्कम अदा करण्याची विनंती आस्थापना अधिकारी, सरकारी वकिलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दि.२२.०७.२०२१ रोजीच्या पत्रान्वये करण्यात आली आहे. त्यानुसार शुल्काचे देयक क्र.२०२१-२२/१५३८, दिनांक १९.०७.२०२१ रक्कम रुपये रु.४,००,०००/- (रुपये चार लाख फक्त) व्यावसायिक शुल्क

(वकील फी) अदा करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. सदर रकमेवर नियमानुसार विहीत केलेला आयकर व त्यावरील शैक्षणिक उपकर वजाती करुन, त्यांना उर्वरित रक्कम अदा करण्यात यावी. त्यासंबंधीची रक्कम त्यांच्या स्टेट बँक ऑफ इंडियाच्या खाते क्र.१०१६२७७८९६८, शाखा व IFSC कोड क्र. SBIN०००६९९४ या खात्यावर जमा करण्यात यावी. त्यांचा पॅन क्रमांक (AABPD७०७३M) असा आहे.

सदर बाबीवर होणारा खर्च " मागणी क्रमांक पी-१ (०९० २०५२, सेक्रेटरिएट-सर्वसाधारण सेवा) ०९०-सचिवालय (००)(०१) संसदीय कार्य विभाग (संकेतांक २०५२०२६८) दत्तमत/योजनेत्तर, २८- व्यावसायीक सेवा" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ मधील मंजूर निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-२ अनुक्रमांक ४९ नियम क्रमांक १६६-अ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१४१७१७५९३११५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarfare Ramesh Sakharam

Digitally signed by Sarfare Ramesh Sakharam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Parliamentary Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=52e560d0b76dfea3392e26761deeb6b2efc5f1bea42c0dffdc1d69d316ae65a8, serialNumber=0c7001609c3ef1f1a1774b5223846fb28e7bf476529c879e1fd04746bfa60fd7, cn=Sarfare Ramesh Sakharam
Date: 2021.09.14 17:21:10 +05'30'

**( र. स. सरफरे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२. सरकारी वकिल,सरकारी वकिलांचे कार्यालय, मूळ शाखा, मा.उच्च न्यायालय,मुंबई
३. अवर सचिव, विधि व न्याय विभाग (ई-शाखा), मंत्रालय,मुंबई
४. महालेखापाल-१ महाराष्ट्र (लेखापरिक्षा), मुंबई
५. महालेखापाल-१ महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
६. मा. मंत्री, संसदीय कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. सचिव,संसदीय कार्य यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
८. आहरण व संवितरण अधिकारी (रोखशाखा), संसदीय कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई(दोन प्रती)

९. कक्ष अधिकारी (का.दोन), संसदीय कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२

१०.कक्ष अधिकारी (का.सहा), संसदीय कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२

११. श्री.रफिक अहमद दादा,विशेष समुपदेशी, मा.उच्च न्यायालय,मुंबई, अरारत कॉन्डोमिनियम,अरारत,दुसरा मजला,८९,नगीनदास मास्टर मार्ग,फोर्ट,मुंबई-४०००२३

१२. निवडनस्ती.